**ग्राहक संस्था, सहकारी गृहनिर्माण संस्था, महिला मंडळे इ.यांना स्वस्त दरात भाजीपाला उपलब्ध करुन देणेबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग**
**क्रमांक - कृबास -२००९/ प्र.क्र. २९८/ ११-स,**
**दिनांक:- २० ऑगस्ट २००९.**

**प्रस्तावना :-**

ग्राहकांना दैनंदिन जीवनावश्यक भाजीपाला, फळे, कांदा-बटाटा, अन्नधान्य व मसाल्याचे पदार्थ इ. किरकोळ स्वरुपात मिळतांना ते घाऊक दरांपेक्षा खुपच जादा दराने विक्री केले जात असल्याचे शासनाच्या निदर्शनास आले आहे. सदर किरकोळ विक्री दरावर नियंत्रण आणण्याच्या दृष्टीकोनातून शासनाने राज्यातील कृषि उत्पन्न बाजार समितीच्या आवारातील व्यापारी असोसीएशनद्वारा शेतमालाची किरकोळ विक्री करण्याचे ठरविले आहे. याकरीता **उपभोक्ता समुह, सहकारी गृहनिर्माण संस्था, महिला मंडळे** इ. यांनी दूरध्वनीवर आपली मागणी नोंदवावयाची आहे. व त्यासाठी किमान एका वेळेस कृषि उत्पन्न बाजार समिती जे ठरवेल तेवढया एकूण विविध प्रकारच्या शेतमालाची मागणी नोंदविणे अपेक्षित आहे. ही योजना कार्यान्वित करण्याकरीता खालीलप्रमाणे आदेश देण्यात येत आहेत.

**शासन निर्णय :-**

१. प्रस्तुतची योजना कार्यान्वित करण्यासाठी प्रत्येक कृषि उत्पन्न बाजार समिती क्षेत्रात व्यापारी संघटनांच्या मार्फत एक यंत्रणा निर्माण करण्यात येईल. या यंत्रणे मार्फत प्रत्येक प्रकारच्या शेतमालाच्या नगाचे त्या दिवसाचे दर जाहिर करण्यात येतील. सदरची माहिती त्या यंत्रणेमार्फत निर्माण केलेल्या एका दूरध्वनी क्रमांकावर उपलब्ध केली जाईल.

२. अशा प्रकारे मागणी नोंदविण्यासाठी उपरोक्त नमूद घटकांनी या यंत्रणेकडे ठरवून दिलेल्या किमान मालाची नोंदणी करावी लागेल.

३. अशा प्रकारे जाहिर केलेल्या माहितीवरुन उपरोक्त नमूद घटक आवश्यक असणा-या शेतमालाची मागणी या यंत्रणेकडे त्यांनी तयार केलेल्या दूरध्वनीक्रमांकावर नोंदवितील.

४. वरील प्रमाणे नोंदणी केल्यानंतर प्रत्यक्ष शेतमाल पाठवितांना एकूण किंमतीवर प्रचलित दर, वाहतूक खर्च व हाताळणी खर्च आकारुन शेतमालाची एकूण किंमत त्या खरेदीदाराला मालाची पोहोच झाल्यावर ताबडतोब रोखीने अदा करावी लागेल.

५. नोंदणी केलेला शेतमाल संबंधीत खरेदीदारास कृषि उत्पन्न बाजार समिती ठरवेल तेव्हा वितरित केला जाईल.

६. कृषि उत्पन्न बाजार समिती खरेदीदारास घाऊक बाजार पेठेत उपलब्ध असलेल्या उत्तम प्रतीच्या मालाचे वितरण केले जाईल याची काळजी घेईल व त्या दिवशीच्या उत्तम प्रतीच्या मालाचा जो दर असेल तो आकारण्यात येईल.

७. प्रत्येक खरेदीदाराने शेतमालाच्या प्रत्येक नगाच्या उपलब्ध असलेल्या उपलब्धतेप्रमाणे मागणी नोंदविणे आवश्यक असेल.

८. जर खरेदीदारास प्लॅस्टीक क्रेटमध्ये शेतमालाचे वितरण केल्यास सदरचा प्लॅस्टीक क्रेट माल खाली करुन ताबडतोब परत करणे बंधनकारक राहील.

९. माल वितरित झाल्यानंतर त्या मालाची पोहोच देणे खरेदीदारावर बंधनकारक राहील.

१०. सदर योजना कोणतेही कारण न देता केव्हाही बंद करण्याचा अधिकार शासनास राहील.

११. राज्यातील कृषि उत्पन्न बाजार समित्यांनी व्यापारी संघाच्या मदतीने हि योजना तात्काळ अंमलात आणावी.

सदर आदेश महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा क्रमांक २००९८२११४१६५४००१ हा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे नावाने व आदेशाने,

(अजिंक्य व.बगाडे)
कक्ष अधिकारी, महाराष्ट्र शासन
सहकार पणन व वस्त्रोद्योग विभाग

प्रत :-

सहकार आयुक्त व निबंधक, सहकारी संस्था, पुणे
कृषि पणन संचालक, महाराष्ट्र राज्य,पुणे.
कार्यकारी संचालक, महाराष्ट्र राज्य कृषि पणन मंडळ, गुलटेकडी, पुणे.३७
सर्व विभागीय सहनिबंधक, सहकारी संस्था
सर्व जिल्हा उपनिबंधक, सहकारी संस्था